**विभागीय परीक्षांचे आयोजन प्रशासकीय विभागांनी करण्याबाबत ....**

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः विपधो २६२०/प्र.क्र.१९/का.१७

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ३२
तारीख : २२ सप्टेंबर, २०२०

**संदर्भ :-** महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे क्र.विपसन २०२०/(१)/(२)/एक, दि. १२ /०२/२०२० चे पत्र.

**शासन परिपत्रक**

प्रशासकीय विभागांच्या विभागीय परीक्षा नियमानुसार खालील प्रयोजनांसाठी विभागीय परीक्षांचे आयोजन करण्यात येते

- नियुक्ती देण्यात आलेल्या पदावर कायम करणे,
- परिवीक्षा कालावधी नियमित करणे,
- वरिष्ठ पदावरील पदोन्नतीकरीता अर्हता तपासणे

२. काही प्रशासकीय विभागांच्या “विभागीय परीक्षा” संबंधित प्रशासकीय विभागामार्फत आयोजित करण्यात येतात. तर काही प्रशासकीय विभागांच्या “विभागीय परीक्षा” महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत आयोजित करण्यात येतात. तथापि, संदर्भाधीन पत्राद्वारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने असे कळविले आहे की, “सन २०२१ पासून आयोगामार्फत कोणत्याही विभागीय परीक्षा घेतल्या जाणार नाहीत”. ही बाब विचारात घेऊन सर्व प्रशासकीय विभागांना सदर परिपत्रकाद्वारे खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहे.

I. ज्या प्रशासकीय विभागांच्या, विभागीय परीक्षांचे आयोजन महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत करण्यात येत होते त्या सर्व प्रशासकीय विभागांनी सन २०२१ पासून त्यांच्या विभागीय परीक्षांचे आयोजन त्यांच्या स्तरावर करावे.

II. ज्या प्रशासकीय विभागांच्या सन २०२० मधील महाराष्ट्र लोकसेवा आयोमार्फत आयोजित होणाऱ्या विभागीय परीक्षांचे आयोजन अद्याप झालेले नाही, अशा प्रशासकीय विभागांनी तात्काळ एक महिन्याच्या आत त्यांच्या विभागीय परीक्षा नियमांनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने परीक्षा आयोजित करण्यासाठी आयोगाकडे मागणीपत्रासह परिपूर्ण प्रस्ताव सादर करण्याची दक्षता घ्यावी. प्रसंगत: असे नमूद करण्यात येते की, विभागांकडून अपूर्ण प्रस्ताव प्राप्त झाल्यास सन २०२० मध्ये देखील आयोगामार्फत विभागीय परीक्षांचे आयोजन करण्याची कार्यवाही केली जाणार नाही, असे संदर्भाधीन पत्राद्वारे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने कळविले असल्यामुळे, त्वरीत एक महिन्यात परिपूर्ण प्रस्ताव आयोगास पाठविण्याची दक्षता घेण्यात यावी.

III. तसेच ज्या प्रशासकीय विभागांच्या “विभागीय परीक्षा” नियमात, सदर परीक्षांचे आयोजन महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत करण्यात येईल, अशी तरतूद नमूद केली असल्यास, सदर तरतूद वगळून परीक्षेचे आयोजन प्रशासकीय विभागामार्फत करण्यात येईल अशी

तरतूद समाविष्ट करण्यासाठी, संबंधित विभागीय परीक्षा नियमामध्ये योग्य ती सुधारणा करावी.

IV. त्याप्रमाणे सन २०२१ पासून विभागाच्या स्तरावर परीक्षेचे आयोजन करावयाचे असल्याने, सदर परीक्षेचे आयोजन वेळेवर होण्याच्या दृष्टीकोनातून, प्रशासकीय विभाग किंवा आयुक्तालय अथवा संचालनालय यांच्या स्तरावर उपलब्ध अधिकारी/कर्मचारी यांच्यामधून परीक्षा आयोजनासाठी एक स्वतंत्र कक्ष स्थापना करण्यात यावा.

V. महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सन २०२१ पासून विभागीय परीक्षांचे आयोजन करण्यात येणार नसल्यामुळे, संबंधित प्रशासकीय विभागांच्या "विभागीय परीक्षा" नियमात वरीप्रमाणे (मुद्दा क्र.III नुसार) सुधारणा होईपर्यंत, सन २०२१ पासून आयोजित होणाऱ्या विभागीय परीक्षांच्या आयोजनास विलंब होऊ नये यास्तव, सदर परिपत्रकात देण्यात आलेल्या सूचनांनुसार संबंधित प्रशासकीय विभागांनी त्यांच्या स्तरावरुन विनाविलंब परीक्षांचे आयोजन करण्याची दक्षता घ्यावी.

३. तथापि, ज्या विभागांच्या सेवा प्रवेश नियमात, नामनिर्देशन व पदोन्नती या दोन नियुक्तीच्या मार्गाव्यतिरिक्त मर्यादित विभागीय परीक्षेद्वारे नियुक्तीचा तिसरा मार्ग नमूद करण्यात आला आहे. अशाप्रकरणी स्पर्धा परीक्षेद्वारे निवडीने नियुक्ती देण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत ज्या मर्यादित विभागीय परीक्षा घेण्यात येतात, त्या मर्यादित विभागीय परीक्षा यापुढेही महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फतच घेण्यात येणार आहेत.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००९२२१५३५५४३९०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Geeta Rahul Kulkarni

Digitally signed by Geeta Rahul Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=87e2e317e0d978442ac6b599d6a0abcf73fe717ee52994443a8509075101cc93, serialNumber=92d474843b842720200d1a10946d5fc9348b9450f867605a47d177207c9bd384, cn=Geeta Rahul Kulkarni
Date: 2020.09.22 15:38:12 +05'30'

**(गीता रा. कुलकर्णी)**
**उप सचिव,सामान्य प्रशासन विभाग**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने),
४. निवड नस्ती.